**राज्यातील वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (रु.३३२.७६ कोटी रोखीने) सन २०२३-२४. (लेखाशिर्ष -२८०१५५९९)**

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. पुरमा-२०२३/प्र.क.१०७/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २८ मार्च, २०२४

<u>संदर्भ</u> :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३
२. उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२३/प्र.क.४६/ऊर्जा-३,दि.६/१०/२०२३ व दि.२३/११/२०२३ व दि.०५/०३/२०२४.
३. उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क.०२/ऊर्जा-३,दि.२०.०२.२०२४
४. महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु. अ.(वा)/शासन/मागणी/सवलत(Gen)/००२१०३, दि.१९/०१/२०२४
५. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.पुरक-२०२३/प्र.क्र.९४/अर्थ-३, दि.१९.१२.२०२३

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार विद्युत वितरण कंपनीला वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून वितरण कंपनीस केली जाते. वितरण कंपन्यांना वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२३-२४ करिता लेखाशिर्ष २८०१५५९९ खाली मूळ नियतव्यय रु.३००.०० कोटी असून सुधारित अंदाजात रु. ७७६.०६७९ कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

सन २०२३-२४ या वर्षाचे खर्चाचे पूरक विवरणपत्र दि. ०७.१२.२०२३ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आले. सदर पुरवणी खर्चास आता विधानसभेने मान्यता दिली आहे. दि.३१.०३.२०२४ रोजी संपणाऱ्या वित्तीय वर्षाच्या विनियोजनांमध्ये समाविष्ट करण्यासाठी पुरवणी विनियोजन विधेयकास मा. राज्यपालांनी संमती दिली आहे. आणि ते महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०२३ (सन २०२३ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.४७) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि.१८.१२.२०२३ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे.

सदर तरतूदीपैकी संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.०६/१०/२०२३ अन्वये रु.१८१.७८ कोटी व शासन निर्णय दि.२३/११/२०२३ अन्वये रु.११८.२२ कोटी असे एकूण रु.३००.०० कोटी इतका निधी समायोजानाने व दि.२०/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.६९.९७७९ कोटी पुनर्विनियोजन करुन समायोजनाने महावितरण कंपनीस वितरित करण्यात आले आहेत. आता वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व ५ वरील शासन परिपत्रकातील सूचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार उर्वरित रक्कम रु.३३२.७६ कोटी (रुपये तीनशे बत्तीस कोटी शहात्तर लाख फक्त) इतका निधी महावितरणला रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

वस्त्रोद्योग ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी सन २०२३-२४ करिता सुधारित अंदाजात अर्थसंकल्पित केलेल्या रु.७७६.०६७९ कोटी रक्कमेपैकी **रु.३३२,७६,००,०००/- (रुपये तीनशे बत्तीस कोटी शहात्तर लाख फक्त)** रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना रोखीने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा “मागणी क्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०३) वस्त्रोद्योग ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५९९), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या उद्देशासाठी मंजूर करण्यात आली आहे, त्याच उद्देशासाठी खर्च करण्याची दक्षता विभाग स्तरावर ऊर्जा-५ कार्यासनाने तसेच महावितरण कंपनीने घ्यावी.

४. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेमार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून डॉ. गौरी पाटील, कार्यासन अधिकारी (उर्जा-३) आणि नियंत्रण अधिकारी म्हणून श्री. ना. श्री. कराड, उप सचिव (उर्जा-३), उद्योग,उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यांनी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना मंजूर झालेली रक्कम रु.३३२,७६,००,०००/- (रुपये तीनशे बत्तीस कोटी शहात्तर लाख फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरित करुन महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांचे नावे स्वतंत्ररीत्या धनादेश काढून/NEFT/RTGS द्वारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. या लेखाशीर्षाखाली निधी वितरीत करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सशर्त असून, वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३ च्या परिपत्रका सोबतच्या परिशिष्टातील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५१/२०२४/व्यय-१६, दिनांक ०४.०३.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०३२८१७१९०६८७१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2024.03.28 17:29:03 +05'30'

**( ना. श्री. कराड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (ऊर्जा) ,यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव (ऊर्जा) मंत्रालय, मुंबई-३२.
१०) प्रधान सचिव (नियोजन) मंत्रालय, मुंबई-३२.
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१४) महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१७) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१८) उप सचिव,(अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९) निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.